**गुंजवणी सिंचन प्रकल्पाचे कालवा/ वितरण प्रणाली दाबयुक्त बंद पाईपव्दारे व त्यापुढे ठिबक पध्दतीने सिंचन करण्याच्या प्रस्तावित संकल्पनेस कोणतीही बाधा न येऊ देता, गुंजवणी जलविद्युत प्रकल्प (१ X २ मेगावॅट) राबविणे, कशा प्रकारे शक्य होईल याचा अभ्यास करण्यासाठी समितीची नियुक्ती.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जविप्र २०१५/प्र.क्र.२९४/जवि**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० जून, २०१८

**प्रस्तावना :**

गुंजवणी सिंचन प्रकल्पासाठी पारंपारिक उघडे कालवे प्रस्तावित करुन दि. ०३.१०.२००२ रोजी महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी सुधारित प्रशासकीय मान्यता दिली आहे. कालवा प्रवाहित करतेवेळी धरण पायथ्याशी गुंजवणी धरण पायथा जलविद्युत प्रकल्प (१ X २ मेगावॅट) खाजगीकरणातून करावयाचा प्रस्तावित असून जलविद्युत विकास करारनामा (HPDA) प्रवर्तकासोबत स्वाक्षांकित व नोंदणीकृत करण्यात आला आहे.

जलविद्युत प्रकल्पासह गुंजवणी सिंचन प्रकल्पाचे कालवा/ वितरण प्रणाली बंद पाईपलाईनमध्ये करण्याबाबतच्या प्रस्तावास शासनाने दि. २१.४.२०१६ अन्वये तत्वत: मान्यता दिली आहे. त्यानुसार तसेच नलिका वितरण व्यवस्थाबाबत शासनाचे दि. ०२.०२.२०१७ च्या मार्गदर्शक सुचनेनुसार गुंजवणी प्रकल्पाचे सदर बंद नलिका कालवा व नारायणपूर उपसा सिंचन योजनेचे संकल्पन करताना धरणातील पाण्याच्या स्तंभाच्या दाबाचा उपयोग करुन दाबाने पाणी देण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे. गुंजवणी सिंचन प्रकल्पाचे कालवा/ वितरण प्रणाली दाबयुक्त बंद पाईपव्दारे व त्यापुढे ठिबक पध्दतीने सिंचन करण्याच्या प्रस्तावित संकल्पनेस कोणतीही बाधा न येऊ देता, गुंजवणी जलविद्युत प्रकल्प (१ X २ मेगावॅट) राबविणे कशा प्रकारे शक्य होईल याचा अभ्यास करण्यासाठी सेवानिवृत्त सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांची एक सदस्यीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

१.०० गुंजवणी सिंचन प्रकल्पाचे कालवा/ वितरण प्रणाली दाबयुक्त बंद पाईपव्दारे व त्यापुढे ठिबक पध्दतीने सिंचन करण्याच्या प्रस्तावित संकल्पनेस कोणतीही बाधा न येऊ देता, गुंजवणी जलविद्युत प्रकल्प (१ X २ मेगावॅट) या दोन्ही बाबींचा विचार होऊन वीजनिर्मिती कशा प्रकारे शक्य

होईल याचा अभ्यास करण्यासाठी श्री. शि. मा. उपासे, सेवानिवृत्त सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांची एक सदस्यीय समिती गठीत करण्यात येत आहे.

२.० सदर समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील :-

गुंजवणी सिंचन प्रकल्पाचे कालवा/ वितरण प्रणाली दाबयुक्त बंद पाईपव्दारे व त्यापुढे ठिबक पध्दतीने सिंचन करण्याच्या प्रस्तावित संकल्पनेस कोणतीही बाधा न येऊ देता, गुंजवणी जलविद्युत प्रकल्प (१ X २ MW) राबविणे कशा प्रकारे शक्य होईल याचा अभ्यास करणे व त्या अनुषंगाने शिफारस करणे.

३.०० समितीने उपरोक्त कार्यवाही एका महिन्यात पूर्ण करावी.

४.०० समितीचे कामकाजासाठी अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे व अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे यांनी आवश्यक ती सर्व कागदपत्रे उपलब्ध करावीत व सहकार्य करावे.

५.०० समिती सदस्याचे मानधन व इतर बाबी याबाबतचा शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.

६.०० सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१८०६२१११५४१९०७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dnyandeo Ananda Bagade

Digitally signed by Dnyandeo Ananda Bagade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6c9c3f117cf64b38033df6ee6108697532342ef3db994d443607916435f8516, serialNumber=857832272f9c6e57a4d72f8a22cf41cccb1c816e7374da487ed5ee3e377def65, cn=Dnyandeo Ananda Bagade
Date: 2018.06.21 11:53:52 +05'30'

**( ज्ञा. आ. बागडे )**
शासनाचे उप सचिव

**प्रत :**

१) मा. मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (प्र. स.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) श्री. श्री. शि.मा. उपासे, निवृत्त सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, महाराष्ट्र.
८) मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
९) मुख्य अभियंता (जलसंपदा), जलसंपदा विभाग, पुणे.
१०) अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे.
११) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे.
१२) जलविद्युत कार्यासन संग्रहार्थ.